**नमो शेतकरी महासन्मान निधी योजने अंतर्गत चौथा हप्ता लाभार्थ्यांना अदा करण्यासाठी, तसेच, प्रशासकीय खर्चासाठी निधी वितरीत करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : पूरक-२०२४/प्र.क्र.१३२/११-अे,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक: २० ऑगस्ट, २०२४

वाचा :-

१) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.किसनि- २०२३/ प्र.क्र.४२/११-अे, दि.१५.६.२०२३.
२) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.पीएफएम-२०२३/प्र.क्र.७२/२-अे, दि.२८.७.२०२३
३) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.पूरक-२०२३/प्र.क्र.८३/११-अे, दि.१०.१०.२०२३
४) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.पूरक-२०२३/प्र.क्र.२२९/११-अे, दि.२१.२.२०२४
५) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.पूरक-२०२३/प्र.क्र.२२९/११-अे, दि.२३.२.२०२४
६) संचालक(वि.प्र.), कृषि आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र.कृ.गणना/न.शे.म.नि./निधी वि.नस्ती/ १८३८७/२०२४, दि.१६.७.२०२४
७) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. २५.७.२०२४

प्रस्तावना :-

सन २०२३-२४ च्या अर्थसंकल्पीय भाषणामध्ये प्रधानमंत्री किसान सन्मान निधी योजनेत राज्य शासनाच्या अनुदानाची भर घालणारी 'नमो शेतकरी महासन्मान निधी' ही योजना घोषित करण्यात आली. त्यास अनुसरुन केंद्र शासनाच्या प्रधानमंत्री किसान सन्मान निधी योजने अंतर्गत देण्यात येणा-या प्रति वर्ष, प्रति शेतकरी रु.६०००/- या अनुदानामध्ये राज्य शासनाची आणखी रु.६०००/- इतक्या निधीची भर घालणारी "नमो शेतकरी महासन्मान निधी" ही योजना राबविण्यास संदर्भ क्र.(१) येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. तसेच, सदर योजने अंतर्गत लाभार्थींना लाभ अदा करणेसाठी एक व राज्यस्तरावर स्थापन करण्यात येणा-या राज्य प्रकल्प संनियंत्रण कक्षाच्या प्रशासकीय खर्चासाठी एक अशी एकूण दोन स्वतंत्र बचत खाती उघडण्यास संदर्भ क्र.(२) येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. प्रस्तुत योजने अंतर्गत संदर्भ क्र.(३) अन्वये पहिला हप्ता (माहे एप्रिल ते जुलै) लाभार्थ्यांना अदा करण्यासाठी रु.१७२० कोटी इतका निधी, संदर्भ क्र.(४) अन्वये दुसरा हप्ता (माहे ऑगस्ट ते नोव्हेंबर) लाभार्थ्यांना अदा करण्यासाठी रु.१७९२ कोटी इतका निधी तसेच, संदर्भ क्र.(५) अन्वये तिसरा हप्ता

(माहे डिसेंबर ते मार्च) लाभार्थ्यांना अदा करण्यासाठी रु.२००० कोटी इतका निधी अशा प्रकारे एकूण रु.५५१२ कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. आता संचालक(वि.प्र.), कृषि आयुक्तालय, पुणे यांनी संदर्भ क्र.(६) येथील पत्रान्वये केलेल्या विनंतीस अनुसरून, सन २०२४-२५ मध्ये नमो शेतकरी महासन्मान निधी योजनेच्या लेखाशिर्षा अंतर्गत मंजूर तरतूदीमधून प्रस्तुत योजने अंतर्गत चौथा हप्ता (माहे एप्रिल ते जुलै) लाभार्थ्यांना अदा करण्यासाठी एकूण रक्कम रू. २०४१.२५ कोटी व योजने अंतर्गत प्रशासकीय खर्चासाठी रक्कम रु.२०.४१ कोटी अशा प्रकारे एकूण रक्कम रु. २०६१.६६ कोटी इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय:-</u>**

नमो शेतकरी महासन्मान निधी योजने अंतर्गत चौथा हप्ता (माहे एप्रिल ते जुलै) लाभार्थ्यांना अदा करण्यासाठी रु.२०४१.२५ कोटी इतका निधी वितरीत करण्यास व योजने अंतर्गत प्रशासकीय खर्चासाठी रु.२०.४१ कोटी, असा एकूण रु.२०६१.६६ कोटी इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रस्तुत खर्च पुढील लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ करिता मंजूर केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा -

**मागणी क्र. डी -३**
**२४०१ - पीक संवर्धन**
**००**
**११५, लहान/सीमान्त शेतक-यांची आणि शेतमजुरांची योजना**
**(००)**
**(००)(०६) - नमो शेतकरी महासन्मान निधी योजना**
**(१००% राज्य योजना) (कार्यक्रम)**
**(२४०१ B४५५), ३३-अर्थसहाय्य**

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणारा निधी संदर्भ क्र. (१) च्या शासन निर्णयात नमूद व शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय /परिपत्रकांमधील तरतूदीनुसार खर्च करण्याची जबाबदारी आयुक्त (कृषि) यांची राहील.

४. उपरोक्त प्रमाणे उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या निधीच्या विनियोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र आयुक्त (कृषि) शासनास सादर करतील.

५. प्रस्तुत योजनेच्या प्रयोजनार्थ आयुक्तालय स्तरावर आयुक्त (कृषि) यांना नियंत्रण अधिकारी व सहाय्यक संचालक, लेखा-१, यांना आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

६. प्रस्तुत शासन निर्णय, नियोजन विभाग व वित्त विभागाने त्यांचे अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनुक्रमे अनौसं. क्रमांक ४०१/का.१४३१, दि.७.८.२०२४ व अनौसं. क्रमांक २४५/व्यय-१, दि.१२.८.२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेताक २०२४०८२०१४२५२२४७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRATIBHA MADHAV PATIL

Digitally signed by PRATIBHA MADHAV PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=b693d975fffc642fe6b87c2ce9e1297fd1e8bda9b459f85f75f159984ba680fd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DA026E85AE8CBB4E3C2ACDBECBBF2F6D6CB0AE6ED5C1E54483490119EE0456AD, cn=PRATIBHA MADHAV PATIL
Date: 2024.08.20 14:41:04 +05'30'

**( प्रतिभा पाटील )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी
४. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी
५. सर्व मा.विधानसभा / मा. विधानपरिषद सदस्य
६. मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव,मंत्रालय,मुंबई ३२
७. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८. अपर मुख्य सचिव (महसूल ), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
९. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०. प्रधान सचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
११. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
१२. सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
१३. महासंचालक, माहिती व ज नसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१४. सर्व विभागीय महसूल आयुक्त (कोकण, नाशिक, पुणे, औरंगाबाद, अमरावती, नागपूर)
१५. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१६. सर्व जिल्हाधिकारी
१७. सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१८. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१९. सर्व जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी
२०. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखापरीक्षा ), मुंबई.
२१. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, ( लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई

२२. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखापरीक्षा ), नागपूर
२३. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता),नागपूर
२४. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
२५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
२६. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
२७. सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२८. सर्व तहसिलदार
२९. सर्व तालुका कृषि अधिकारी
३०. निवडनस्ती, कार्यासन ११-अे.